# महाराष्ट्र शासन
## कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग
## शासन परिपत्रक क्रमांक: पीआयएल- २०२०/प्र.क्र. १३५/पदुम ८

मंत्रालय, मुंबई ४०००३२

तारीख: २६ ऑक्टोबर, २०२०

## परिपत्रक

**पार्श्वभुमी-**

मा. उच्च न्यायालय, मुंबई येथे जनहित याचिका क्र. ५५६२/२०२० (शरद जोशी विचारमंच शेतकरी संघटना विरुध्द महाराष्ट्र राज्य व इतर) दाखल करण्यात आली होती. सदर जनहित याचिकेत मा. उच्च न्यायालय, मुंबई यांनी दि. २१.०८.२०२० रोजी खालीलप्रमाणे आदेश पारित केले आहेत.

1. Having heard Mr. Talhar, learned advocate for the petitioner and Mr. Samant, learned AGP appearing for the State and considering the nature of grievance raised by the petitioner in this petition, we are of the firm opinion that interest of justice would be sufficiently served if the Secretary, Dairy development and Animal Husbandry, Government of Maharashtra proceeds to consider and dispose of the petitioner's representation dated March 21, 2020 (exhibit-'D') within a time frame to be fixed for such purpose.
2. Accordingly, without expressing any opinion on merits, this PIL petition stands disposed of with a direction to such Secretary to consider and dispose of the said representation of the petitioner dated March 21, 2020 after giving the petitioner or its authorised representative, an opportunity of hearing and by passing reasoned order in accordance with law within six weeks from the date of receipt of a copy of this order together with the copy of PIL petition.

मा.उच्च न्यायालयाने वरीलप्रमाणे आदेशित केल्यानुसार प्रधान सचिव (पदुम) यांच्या दालनात दि.८.१०.२०२० रोजी दुपारी ३.०० वाजता सर्व संबंधितांची सुनावणी आयोजित करण्यात आली होती. सदर सुनावणीत शरद जोशी विचारमंच शेतकरी संघटनेचे प्रदेश अध्यक्ष श्री. विठ्ठल पवार राजे व इतर यांचे म्हणणे ऐकून घेण्यात आले. तसेच त्यांच्या दिनांक २१.३.२०२० रोजीच्या अर्जात उपस्थित केलेले सर्व मुद्दे लक्षात घेण्यात आले. शरद जोशी विचारमंच शेतकरी संघटना यांच्या निवेदनातील मुद्यांमध्ये खालील बाबी अंतभूर्त आहेत:-

१. राज्यातील कोरोना प्रादुर्भावाचा फायदा घेऊन काही दुग्धव्यावसायिकांनी दुध दर रु.१० ते ७ रुपयांनी कमी केले आहे. अनेक दूध संस्था शेतकऱ्यांनी दूध दिल्यानंतर डेअरी व्यावसायिक नोंद करून माहिती खरेदी/पावती देत नाहीत केवळ कच्च्या नोंदी ठेवत आहेत. पुणे-सातारा जिल्ह्यात दुध तपासणी यंत्रणा उपलब्ध असूनही वापरली जात नाही.

२. दूधाच्या गुणवत्तेसंदर्भात (३.५ फॅट व ८.५ SNF) च्या नोंदी ठेवल्या जात नाहीत. अनेक दूध संस्थांचे कलेक्शन व विक्री साठा यात मोठी तफावत येत आहे. एकूण दूध उत्पादन व मागणी यात १ कोटी लिटर चा फरक आहे. दूध खरेदी पावत्या न देणाऱ्यावर छापेमारी करावी, उत्पादन व प्रत्यक्ष दुध साठा तपासणे. म.स. संस्था अधिनियम १९६० कलम ७९ अ अन्वये कारवाई करावी.

३. दूधाच्या खरेदी व साठ्याची तपासणी करण्यात यावी. खाजगी व सहकारी दूध संस्था पशुखाद्य एमआरपी न लिहता तिप्पट दराने विक्री करून शेतकऱ्यांची आर्थिक पिळवणूक करीत आहेत. याबाबत चौकशी करावी. दुधाचे दर वाढ ४० रु. गाईचे व ५० रुपये म्हशीचे दुध दर जाहीर करावेत.

शरद जोशी विचारमंच शेतकरी संघटना यांनी त्यांच्या वरील निवेदनातील नमूद केलेले मुद्दे हे मुख्यत: दूध भेसळ, दुग्धप्रकल्प चालक दूध दिल्यानंतर खरेदीची पावती न देणे, दूध संस्थांचे संकलन व विक्रीसाठा यात मोठी तफावत असणे, खाजगी व सहकारी दूध संस्था हे पशुखाद्यावर एमआरपी न लिहीता तिप्पट दराने विक्री करुन शेतकऱ्यांची आर्थिक पिळवणूक करणे यासंदर्भातील आहेत. सदर मुद्दे हे अन्न व औषध प्रशासन, आयुक्त, दुग्धव्यवसाय, नियंत्रक, वजन व मापे व सहनिबंधक, सहकारी संस्था (दुग्ध) या प्राधिकरणांशी संबंधित असल्याने खालीलप्रमाणे संबंधित प्राधिकरण/प्रशासकीय विभागांनी कार्यवाही करावी अशी त्यांना विनंती करण्यात येत आहे :-

१) राज्यातील दूधामध्ये मोठ्या प्रमाणात भेसळ करण्यात येते. या भेसळीमुळे जनतेच्या आरोग्यावर विपरित परिणाम होतो. सदर भेसळ नियंत्रणात आणल्यास स्वच्छ व गुणवत्तापूर्वक दूधाचा पुरवठा करणे शक्य होईल. दूधाची भेसळ रोखण्याकरीता आयुक्त, अन्न व औषध प्रशासन तसेच आयुक्त, दुग्धव्यवसाय या कार्यालयाच्या अधिपत्याखालील अधिकाऱ्यांचे एक संयुक्त पथक दि.३ मार्च, २०२० रोजीच्या वैद्यकिय शिक्षण व औषधी द्रव्ये विभागामार्फत निर्गमित करण्यात आलेल्या शासन निर्णयान्वये नियुक्त करण्यात आले आहे.

या पथकामार्फत करण्यात येणारी कार्यवाही अधिक सक्षमपणे होणे आवश्यक असल्याने यासंदर्भात नियुक्त करण्यात आलेल्या संबंधित जिल्ह्याचे सहाय्यक आयुक्त, (अन्न), अन्न व औषध प्रशासन व जिल्हा दुग्धव्यवसाय विकास अधिकारी, दुग्धव्यवसाय विकास विभाग या पथकप्रमुखांनी धडक मोहिम हाती घ्यावी. या पथकामार्फत करण्यात येणाऱ्या कार्यवाहीचे सनियंत्रण आयुक्त, दुग्धव्यवसाय यांच्यामार्फत करण्यात येऊन याअंतर्गत करण्यात येणाऱ्या कार्यवाहीचा प्रगती अहवाल शासनास दर १५ दिवसानी सादर करावा.

२) दूध उत्पादक शेतक-यांकडून खरेदी करण्यात येणा-या दुधाच्या खरेदी पावत्या न देणे, दुध खरेदीबाबत कच्च्या नोंदी ठेवणे, दुध तपासणी यंत्रणा उपलब्ध असूनही त्याचा वापर न करणे, दुधाच्या गुणप्रतीच्या नोंदी न ठेवणे, दुध उत्पादन व प्रत्यक्ष दुध साठा यातील तफ़ावत या व अशा प्रकारच्या तक्रारी शासन तसेच संबंधित प्राधिकरणांना वेळोवेळी प्राप्त होत असतात. सदर तक्रारींवर सर्व जिल्हा दुग्धव्यवसाय विकास अधिकारी, दुग्धव्यवसाय विकास विभाग, सहनिबंधक, सहकारी संस्था (दुग्ध), महाराष्ट्र राज्य, मुंबई व नियंत्रक, वैध मापन शास्त्र यांनी त्यांच्याशी संबंधित

असलेल्या तक्रारींवर तातडीने कार्यवाही करणे आवश्यक आहे. यासंदर्भात मा.उच्च न्यायालयाने दिलेल्या आदेशानुसार सदर सूचना निर्गमित करण्यात येत असल्याने संबंधित अंमलबजावणी यंत्रंणांनी याप्रकरणी तात्काळ कार्यवाही होईल याची दक्षता घ्यावी.

३) खाजगी व सहकारी दुध संस्था एमआरपी न लिहिता पशुखाद्य तिप्पट दराने विक्री करतात असा मुद्दा अर्जदाराच्या निवेदनात नमूद करण्यात आला आहे. एमआरपी हा विषय अन्न व नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण या विभागाच्या अंतर्गत येत असून, अशा प्रकरणी आवश्यक ती कार्यवाही अन्न व नागरी पुरवठा विभागामार्फत होणे आवश्यक आहे. यासंदर्भात अन्न नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभागाने नियंत्रक, वैध मापन शास्त्र यांना प्राप्त तक्रारींवर तातडीने कार्यवाही करण्याबाबतच्या सूचना निर्गमित कराव्यात अशी त्या विभागास विनंती करण्यात येत आहे.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२०१०२६१५१०४८३७०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Rajesh Shaligram Govil

Digitally signed by Rajesh Shaligram Govil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture and ADF Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c549410b2251df8c92783a2da17afcacbe7f8fe3a4fd88f156fea84433871f11, serialNumber=3cec7a5cf8d124a0d8e15bfc85a782c01ef27eaee8bedaba4dce3416562097ac, cn=Rajesh Shaligram Govil
Date: 2020.10.26 15:16:03 +05'30'

**(राजेश गोविल)**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मंत्री (पशुसंवर्धन व दुग्धव्यवसाय) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई.
२. मा.राज्यमंत्री (पदुम) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. श्री. विठ्ठल पवार राजे, प्रदेश अध्यक्ष, शरद जोशी विचारमंच शेतकरी संघटना.
४. प्रधान सचिव, अन्न व नागरी पुरवठा विभाग, मंत्रालय, मुंबई
५. प्रधान सचिव, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, गोकूळदास तेजपाल रूग्णालयाचे आवार, लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई
६. आयुक्त, अन्न व औषध प्रशासन विभाग, बांद्रा-कुर्ला कॉम्लेक्स, बांद्रा (पू.), मुंबई
७. आयुक्त, दुग्धव्यवसाय विकास विभाग, महाराष्ट्र राज्य, वरळी, मुंबई
८. सहनिबंधक सहकारी संस्था (दुग्ध), वरळी, मुंबई
९. सरकारी अभियोक्ता, मा.उच्च न्यायालय,मुंबई.
१०.नियंत्रक, वैध मापन शास्त्र, महाराष्ट्र राज्य, शासकीय कुटीर क्र. ७, फ्री प्रेस जर्नल मार्ग, मुंबई
११.निवड नस्ती, पदुम-१०.